**शेतकरी व्यक्तिगत अपघात विमा योजना**
**खंडीत कालावधीचे दावे अदा करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
कृषि, पशुसंवर्धन, दुग्ध व्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
शासन निर्णय क्रमांक शेअवि २००८/प्र.क्र.४२०/११अे
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२
दिनांक -२२ फेब्रुवारी, २०१०

**वाचा :-**१)शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र.एनएआयएस-१२०४/प्र.क्र.१६६/११अे, दि.१९ऑगस्ट, २००४
२)शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र.एनएआयएस-१२०४/प्र.क्र.१६६/११अे, दि.५जानेवारी, २००५
३)शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र.एनएआयएस १२०४/प्र.क्र.१६६/११अे, दि.३१मार्च, २००५
४)शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र.पीएआयएस १२०५/ प्र.क्र.३१०/११अे, दि.७जुलै, २००६.
५)शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र.शेअवि २००८/प्र.क्र.१३१/११अे, दि. ३ मे, २००८.
६)आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.शेअवि २००९/प्र.क्र. ३४/सां९/ ८३८/२००९, दि. ३० नोव्हेंबर,२००९.
७)शासन निर्णय,कृषि व पदुम विभाग क्र.पुनर्वि-१००९/(प्र.क्र.१९२/०९)/२अे, दि.२२ फेब्रुवारी, २०१०.

**प्रस्तावना :-**

शेतकऱ्यांना शेती व्यवसाय करताना अथवा अन्यवेळी होणाऱ्या अपघातापासून कोणत्याही प्रकारचे विमा संरक्षण उपलब्ध नव्हते व त्यासाठी कोणतीही योजना नव्हती. यास्तव, शासनाने शेतकरी व्यक्तिगत अपघात विमा योजना सुरु केली. प्रथमतः सदर योजना दिनांक १० जानेवारी,२००५ ते ९ एप्रिल,२००६ या १५ महिन्यांच्या कालावधीसाठी आयसीआयसीआय लोंबार्ड जनरल इन्शुरन्स कंपनीमार्फत राबविण्यात आली. त्यानंतर या योजनेचे अथवा पॉलिसीचे पुढील वर्षासाठी नुतनीकरण करण्याच्या प्रक्रियेमध्ये दि. १० एप्रिल, २००६ ते १४ जुलै, २००६ असा एकूण ९६ दिवसांचा खंड पडला होता. या खंडीत कालावधीतील प्राप्त विमा दावे मंजूर करून अदा करण्यासाठी आयुक्त (कृषि) यांना उपरोक्त क्र.५ येथील शासन निर्णयान्वये प्राधिकृत करण्यात आले आहे.

या खंडीत कालावधीतील प्राप्त विमा दावे तपासून त्यांच्या पात्र/अपात्रतेबाबतची छाननी कबाल इन्शुरन्स ब्रोकिंग सर्व्हिसेस प्रा.लि., मुंबई या शासन नियुक्त विमा सल्लागार कंपनीमार्फत करण्यात आली असून त्यापैकी प्रथम टप्प्यात २८१ विमा दावे आयुक्त (कृषि) यांचे अध्यक्षतेखालील समितीने पात्र ठरविले आहेत. त्याची यादी उपरोक्त क्र.६ येथील पत्रान्वये शासनास सादर केली आहे. सदर विमा दाव्यांकरिता एकूण रु.२,७७,५०,०००/- इतकी रक्कम मंजूर करण्याची बाब शासनाचे विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

शेतकरी व्यक्तिगत अपघात विमा योजनेच्या दिनांक १० एप्रिल,२००६ ते १४ जुलै,२००६ या खंडीत कालावधीतील प्राप्त दाव्यांपैकी प्रथम टप्प्यात पात्र ठरलेल्या २८१ दाव्यांसाठी एकूण रु.२,७७,५०,०००/- (अक्षरी रुपये दोन कोटी सत्याहत्तर लाख पन्नास हजार फक्त) इतक्या रकमेस शासन मान्यता देण्यात येत आहे.

**कृ.मा.प.**

२. उपरोक्त क्र.४ येथील शासन निर्णयामधील तरतुदीनुसार शेतकऱ्याचा मृत्यू झाल्यास रु.१,००,०००/- व अपंगत्व आल्यास प्रकरणपरत्वे रु.५०,०००/- किंवा रु.१,००,०००/- या प्रमाणे अर्थसहाय्य मंजूर करण्यात येते.

३. सदर प्रयोजनार्थ सहायक संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य पुणे-१ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. यावरील खर्च "मागणी क्रमांक डी-३, २४०१-पीक संवर्धन, ११०-पीक विमा, (००) (०६) शेतकऱ्यांसाठी वैयक्तिक अपघात विमा योजना (२४०१ ४४२७), राज्य योजना, ३३-अर्थसहाय्य" या लेखाशिर्षाखाली सन २००९-१० करिता मंजूर अर्थसंकल्पीय तरतुदीतून तसेच उपरोक्त क्र.७ येथील शासन निर्णयान्वये पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या व वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनुक्रमे अनौपचारिक संदर्भ क्रमांक ५३३/१४३१, दिनांक १४ जानेवारी, २०१० व क्रमांक १०/१०/व्यय-१, दिनांक २० जानेवारी, २०१० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra.gov.in** या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०१००२२२१९४६३९००१ असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

**( ब. दि. उमाटे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव
२) मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
३) मा.उपमुख्यमंत्र्यांचे सचिव
४) मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
५) सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
६) मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक
७) प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
८) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
९) सहायक संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य पुणे-१
१०) अध्यक्ष, कबाल इन्शुरन्स ब्रोकींग सर्व्हिसेस प्रा. लि., ११८-बी, मित्तल टॉवर, ११ वा मजला, २१०, नरीमन पॉईंट, मुंबई-४०० ०२१
११)महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई /नागपूर
१२)संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१३)अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१४) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे

१५)महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
१६)मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१
१७)सर्व विभागीय कृषि सह संचालक
१८)सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
१९)सर्व सहसचिव /उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२०)निवड नस्ती, का. ११-अे